**वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातूर येथील सर्वे क्र. ३७ मधील १० एकर जमिन शासकीय मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल, लातूर करीता उपलब्ध करुन देण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मकृवि १२१८/प्र. क्र.३१/७अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०१९.**

**संदर्भ**:- १) कुलसचिव, वनामकृवि, परभणी यांचे पत्र क्रमांक एसअे-१/२०१८, दि. २७.१२.२०१८
२) महासंचालक, कृषि परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांक मकृप/विशि-२/१९४/२०१८, दि.२१.१.२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कृषी विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ३ (३) मध्ये "प्रत्येक विद्यापीठ, जंगम व स्थावर अशी दोन्ही प्रकारची मालमत्ता संपादन व धारण करण्यास, विद्यापीठाच्या प्रयोजनासाठी त्यांच्याकडे निहित असेल किंवा त्यांच्याकडून संपादन करण्यात येईल अशी कोणतीही जंगम किंवा स्थावर मालमत्ता पट्टयाने देण्यास, विकण्यास किंवा अन्यथा हस्तांतरीत करण्यास किंवा तिची विल्हेवाट लावण्यास व या अधिनियमाच्या प्रयोजनासाठी आवश्यक असतील अशा इतर सर्व गोष्टी करण्यास सक्षम असेल" अशी तरतूद असून कलम ३ (३ ) च्या परंतुकानुसार कृषी विद्यापीठाकडील स्थावर मालमत्ता अशा रितीने पट्टयाने देणे, तिची विक्री करणे किंवा ती हस्तांतरीत करणे या गोष्ट राज्य शासनाच्या पूर्वसंमतीशिवाय केल्या जाणार नाहीत अशी तरतूद आहे.

सदर तरतूदीनुसार, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ कार्यकारी परिषदच्या दि. ८.१२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीमध्ये ठराव क्र. काप-५९/८.१२.२०१८ अन्वये वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातूर येथील जमिन शासकीय मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल, लातूर करीता उपलब्ध करुन देण्याबाबत विद्यापीठ कार्यकारी परिषदेने तत्वत: शिफारस करुन, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ व महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम १९९० मधील या संदर्भातील तरतुदी, या संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय आणि स्थायी आदेश विचारात घेवून व शासनाच्या विशेष अधिकारात विषयांकित प्रयोजनासाठी कृषि महाविद्यालय, लातूर येथील सर्वे क्र. ३७ मधील १० एकर जमिन मंजूर करण्यास मंजूरी प्रदान केलेली आहे. तसेच सदर प्रस्तावास मा. मंत्री (कृषि) तथा अध्यक्ष, कृषि परिषद यांनी कृषि परिषदेच्या ९८ व्या बैठकीच्या अधीन राहून मान्यता प्रदान केलेली आहे. सबब, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठांतर्गत कृषि महाविद्यालय, लातूर येथील सर्व्हे नं. ३७ मधील १० एकर जमिन विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून शासकीय मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल लातूर करीता उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेने दि. ८.१२.२०१८ रोजी आणि मा. मंत्री (कृषि) तथा अध्यक्ष, कृषि परिषद यांनी उक्त प्रस्तावास कृषि परिषदेच्या आगामी बैठकीच्या अधिन राहून दिलेल्या मान्यतेनुसार, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातूर येथील सर्व्हे नं. ३७ मधील १० एकर जमिन शासकीय मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल, लातूर करीता पुढील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती..**

१) सदर जमिनीचे प्रचलित बाजार मूल्य दर तक्त्यानुसार येणारी रक्कम कृषि महाविद्यालय, लातूर तसेच विद्यापीठाच्या विकास कामासाठी उपलब्ध करुन देण्यात यावी.

२) सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालय किंवा अन्य न्यायालयाने अधिकचा मावेजा संबंधितास अदा करण्याबाबत आदेश दिल्यास सदर रकमेची भरपाई जिल्हा रुग्णालय, लातूर व पर्यायाने सार्वजनिक आरोग्य विभागाकडून करण्यात यावी.

३) सदर जमिन ही ज्या कारणासाठी हस्तांतरीत करण्यात आली आहे त्याच कारणासाठी वापर करावा व सदर जमीन इतरांना हस्तांतरीत करु नये तसेच त्रयस्थ पक्षकारांचा कोणताही हितसंबंध, हक्क निर्माण करु नये .

४) वरील अटींचा भंग केल्याचे निदर्शनास आल्यास सदर जमीन ताब्यात घेण्यास कृषि विद्यापीठास पुर्ण मुभा असेल .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०२०४१२५२०८७००१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2019.02.04 12:57:13 +05'30'

**(प्रताप व्य. गिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल-नि-कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
८. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
९. जिल्हाधिकारी, लातूर
१०. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर परिमंडळ, लातूर
११. निवड नस्ती, कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.